महापारेषण कंपनीच्या ट्रान्समिशन सिस्टीम
प्रोजेक्ट हया बाहय सहाय्यित प्रकल्पाला
जपान बँक फॉर इंटरनॅशनल कोऑपरेशन
कडून मिळणा-या कर्जाला मंजूरी देणे...

**महाराष्ट्र शासन**

उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र. कर्ज -२०१०/प्र.क्र.१२५/ऊर्जा-३,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १६ नोव्हेंबर, २०११.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्यादितला त्यांच्या ट्रान्समिशन सिस्टीम प्रोजेक्ट हया बाहय सहाय्यित प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या पुढाकाराने जपान बँक फॉर इंटरनॅशनल कोऑपरेशन कडून १६७४९ दशलक्ष जपानी येन (सुमारे ६२३ कोटी रुपये) कर्ज मंजूर झाले असून कर्जासंदर्भात महापारेषण कंपनी, जपान बँक फॉर इंटरनॅशनल कोऑपरेशन आणि केंद्र शासन यांच्या दरम्यान दि.१४.०९.२००७ रोजी करार झाला आहे. केंद्र शासनाकडून सदर कर्जाची रक्कम भारतीय रिझर्व्ह बँकेमार्फत थेट महापारेषण कंपनीला उपलब्ध करून दिली जाते. आतापर्यंत वित्तीय वर्ष २००९-२०१० मध्ये रु.३४० कोटी आणि वित्तीय वर्ष २०१०-२०११ मध्ये रु.१८८ कोटी इतकी रक्कम कंपनीला वितरीत झाली असून उर्वरित रक्कम अदयाप वितरीत व्हायची आहे. कर्जाची रक्कम थेट वितरीत होत असली तरी भारतीय रिझर्व्ह बँकेकडून ती राज्य शासनाच्या लेखांमध्ये वर्ग केली जात आहे. त्यासाठी लेखाशीर्ष

मागणी के-११
मुख्य लेखाशीर्ष ६८०१
६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे
१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे
०३ ट्रान्समिशन सिस्टीम प्रोजेक्ट या योजनेसाठी पारेषण कंपनीस कर्जे
५५ कर्जे व अगाउ रकमा

खाली मानीव वित्तीय तरतूद करणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र राज्य विदयुत पारेषण कंपनी मर्यादितला त्यांच्या ट्रान्समिशन सिस्टीम प्रोजेक्ट हया बाहय सहाय्यित प्रकल्पासाठी केंद्र शासनमार्फत जपान बँक फॉर इंटरनॅशनल कोऑपरेशन कडून ०.७५% व्याजदराने १६७४९ दशलक्ष जपानी येन (सुमारे ६२३ कोटी रुपये) इतक्या एकूण मिळणा-या कर्जाची नोंद पुढील लेखाशीर्षात दर्शविण्यात यावी.

मागणी क्र-११
मुख्य लेखाशीर्ष ६८०१
६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे
१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे
०३ ट्रान्समिशन सिस्टीम प्रोजेक्ट या योजनेसाठी पारेषण कंपनीस कर्जे
५५ कर्जे व आगाउ रकमा

२. याआधी प्राप्त झालेल्या कर्जाच्या रकमा आहरीत करण्यासाठी उपरोक्त लेखाशीर्षाखाली मानीव तरतूद करण्यात येईल. कर्जाचा व्याजासहीत परतफेडीचा पहिला हप्ता दि.२०.०९.२०१२ रोजी देय होणार असून, त्यानंतर प्रत्येक सहा महिन्याला पुढील हप्ता देय राहील. अंतीम हप्ता दि.२०.०९.२०२२ रोजी देय होईल. (कर्जाच्या परतफेडीचे विवरणपत्र सोबत जोडले आहे.)

३. केंद्र शासनामार्फत मिळालेल्या सदर कर्जाच्या परतफेडीमध्ये कंपनीकडून प्रतिपूर्ती न झाल्यास किंवा विलंब झाला तर त्याला राज्य शासनाची कोणतीही जबाबदारी रहाणार नाही, त्याबाबतची पूर्ण जबाबदारी महापारेषण कंपनीची राहील.

४. कर्जाची परतफेड केंद्र शासनामार्फत जपान बँक फॉर इंटरनॅशनल कोऑपरेशनला परकीय चलनात केली जाणार असली तरी महापारेषण कंपनीने राज्य शासनामार्फत केंद्र शासनाला कर्जाची परतफेड भारतीय रुपयात करावयाची आहे. परकीय चलनाच्या विनिमय दरातील चढउतारामुळे जर कर्जाच्या परतफेडीच्या रकमेत वाढ झाली तर त्याचा भार महापारेषण कंपनीवर पडेल, राज्य शासन त्याचा भार सोसणार नाही.

५. ट्रान्समिशन सिस्टीम प्रोजेक्ट हया प्रकल्पाचा एकूण अंदाजित खर्च - रु. ७७८ कोटी

प्रकल्पाच्या एकूण अंदाजित खर्चापैकी - कर्जाद्वारे उभारावयाची रक्कम - रु. ६२३ कोटी
कंपनीच्या अंतर्गत स्त्रोतातून उभारावयाची रक्कम - रु. १५५ कोटी

प्रकल्प पूर्ण होण्याची अपेक्षित तारीख -- ३० नोव्हेंबर २०११.

६. सदर प्रकल्पास महापारेषण कंपनीच्या संचालक मंडळाने त्यांच्या ठराव क्रमांक बी.आर.नं. ११४, दि.२०.०४.२००७ अन्वये मंजूरी दिली असून ठराव क्रमांक बी.आर.नं.१९/१८, दि.१७.१०.२००७ अन्वये सुधारित मंजूरी दिली आहे.

७.	प्रस्तुत कर्ज वाशी, पुणे, नाशिक व कराड हया परिसरात १०८ सबस्टेशन्समध्ये १८० ट्रान्सफॉरमर्स उभारण्यासाठी वापरण्यात आले आहे. आतापर्यंत १७९ ट्रान्सफॉरमर्सची उभारणी पूर्ण झाली असून उर्वरित काम लवकरच पूर्ण होणार आहे.

८.	महाराष्ट्र राज्य विदयुत पारेषण कंपनी, जपान बँक फॉर इंटरनॅशनल कोऑपरेशन आणि केंद्र शासन यांच्यात दि. १४.०९.२००७ रोजी झालेल्या करारातील अटी व शर्तीनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी महापारेषण कंपनीची राहील.

९.	हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८४/१४६२ दिनांक ७.३.२०११ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १४८/२०११/अर्थबळ, दिनांक १.१०.२०११ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३०/व्यय-१६/११, दिनांक ४.१०.२०११ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०.	सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 201111161128150001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(कुंदा आ. रेठरेकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय
मा. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव महाराष्ट्र शासन, मंत्रालय
मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व मा. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव मंत्रालयीन विभाग, मुंबई ३२.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी, मर्या. मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, मर्या. मुंबई -- ५१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी, मर्या. मुंबई -- ५१
व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.मुंबई -५१
सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, १३ वा मजला कफ परेड, मुंबई
मुख्य अभियंता (विद्युत) सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट,मुंबई
मा.राज्य मंत्री, ऊर्जा यांचे खाजगी सचिव
मा.उपमुख्यमंत्री ऊर्जा यांचे विशेष कार्य अधिकारी

नियोजन विभाग, कार्यासन-१४६२
वित्त विभाग, व्यय-१६, अर्थबळ,
सर्व मंत्रालयीन विभाग.
ऊर्जा प्रभागातील सर्व कार्यासने.
अवर सचिव रोख शाखा, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
क.अ.प्रशा-२ उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, सदरहू शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करुन द्यावा.
निवड नस्ती

## REPAYMENT OF PRINCIPAL SCHEDULE JICA LOAN IDP 188 & 188-A

| DUE DATE | IDP 188 | IDP 188-A |
|---|---|---|
| 20.09.12 | 789780000 | 7820000 |
| 20.03.13 | 789761000 | 7809000 |
| 20.09.13 | 789761000 | 7809000 |
| 20.03.14 | 789761000 | 7809000 |
| 20.09.14 | 789761000 | 7809000 |
| 20.03.15 | 789761000 | 7809000 |
| 20.09.15 | 789761000 | 7809000 |
| 20.03.16 | 789761000 | 7809000 |
| 20.09.16 | 789761000 | 7809000 |
| 20.03.17 | 789761000 | 7809000 |
| 20.09.17 | 789761000 | 7809000 |
| 20.03.18 | 789761000 | 7809000 |
| 20.09.18 | 789761000 | 7809000 |
| 20.03.19 | 789761000 | 7809000 |
| 20.09.19 | 789761000 | 7809000 |
| 20.03.20 | 789761000 | 7809000 |
| 20.09.20 | 789761000 | 7809000 |
| 20.03.21 | 789761000 | 7809000 |
| 20.09.21 | 789761000 | 7809000 |
| 20.03.22 | 789761000 | 7809000 |
| 20.09.22 | 789761000 | 7809000 |
| GRAND TOTAL | 16585000000 | 164,000,000.00 |

IDP 188 + IDP 188-A = 16749000000/- WITH JPY